राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.
(लेखाशिर्ष-२२१५ २०७१)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/प्र.क्र.७४/पापु-१०

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ४ जुलै, २०१८

**वाचा**

१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.
२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र. मजीप्रा/वित्त.२/अंप/उप-२०१७-१८/५८/२०१८, दिनांक १ जून, २०१८

**प्रस्तावना**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत आहे. सदर कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाव्दारे अंमलबजावणी करण्यात येणा-या नळ पाणी पुरवठा योजनांकरिता संदर्भाधीन पत्रान्वये निधीची मागणी करण्यात आली आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मागणी क्र.वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना-राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणा-या नळ पाणी पुरवठा योजनाच्या अंमलबजावणी करिता रु. २,००० लाख (रुपये वीस कोटी मात्र) इतके अनुदान महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना कव्हरेज व गुणवत्ताबाधीत या घटकासाठी अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींच्या अधीन मंजूर व मुक्त करण्यात येत आहे

**अटी:-**

१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या कव्हरेज व गुणवत्ताबाधीत

गावे/वाड्यांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाड्यांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे, अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचा आहे.

२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३) या शासन निर्णयातील अटी व शर्ती राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे याची शासनाला खात्री करून घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांनी तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पुस्तके व लेखा पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकास कार्यासन पापु-१०/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

६) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS या प्रणालीवर घेऊन सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात. सदर कार्यक्रमांतर्गत केलेल्या खर्चाची नोंद IMIS प्रणालीवर घेण्याकरिता NODEL OFFICER नियुक्त करण्यात यावा. IMIS प्रणालीवर माहिती अद्यायावत न झाल्यास संबंधीत NODEL OFFICER वर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

७) सदर निधी कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या गावांच्या प्रगतीपथावरील योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करून देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे.

८) उपरोक्त निधीसंदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. २,००० लाख (अक्षरी रुपये वीस कोटी मात्र) याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक

(वित्त), (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. व. भि. माने ) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक (वित्त), (श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ( श्री. व.भि. माने) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे जीवन प्राधिकरण यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

३. यावर होणारा खर्च क्र. वाय-२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वचछता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना-राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम यासाठी अनुदाने (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१८-१९ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद ७ ते ८ मधील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटींची पुर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१८०७०२१११४४८३८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.07.05 11:46:14 +05'30'

**( व. भि. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) उप सचिव ( रोखशाखा ), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

६) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई
७) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र २, नागपूर. नियोजन विभाग
१०) मु. अ. तथा वि.का. अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, सर्व.
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सर्व.
१३) कार्यकारी अभियंता , महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सर्व.
१४) नियोजन विभाग (कार्यासन-१४४३)/वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
१५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. ४ व २०
१६) निवड नस्ती (पापु-१०)